**लोकलेखा समितिचे विनियोजन लेखे अहवाल परिच्छेद, नागरी अहवाल परिच्छेद व लोकलेखा समितीच्या शिफारशींवरील व विधीमंडळाच्या विविध समित्यांचे प्रलंबित संदर्भ, विधीमंडळाशी संबंधित अन्य कामकाजावरील कार्यवाही सर्वोच्च प्राधान्याने करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकिर्ण-२०१५/प्र.क्र.९५ /समन्वय कक्ष,**
बांधकाम भवन,२५,मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई-४०० ००१.
तारीख: १९ ऑक्टोंबर,२०१५

वाचा -

१) **मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे अ.शा. पत्र क्रमांक-लोलेस २०१५ /प्र.क्र.१२९/लोलेस, दि.०९ ऑक्टोंबर,२०१५**
२) **शासन निर्णय व परिपत्रक क्र.भानिम १०११/प्र.क्र.१९/लोलेस, दि.१० मे,२०११.**

प्रस्तावना-

लोकलेखा समितीचे विनियोजन लेखे अहवाल परिच्छेद, नागरी अहवाल परिच्छेद व लोकलेखा समितीच्या शिफारशींवर केलेल्या कार्यवाहीचा अहवाल लोकलेखा समितीस सादर होण्यास होणाऱ्या अमर्याद विलंबाबाबत मा.मुख्य सचिवांची दि.७.१०.२०१५ रोजी समितीने साक्ष घेतली. सदर साक्षीदरम्यान मा.अध्यक्ष, लोकलेखा समिती तसेच इतर सन्माननीय सदस्य यांनी लोकलेखा समितीच्या कामकाजाकडे संबंधित विभागांकडून अग्रक्रमाने लक्ष दिले जात नाही, तसेच संबंधित अधिकारी पुरेशा

तयारीने बैठकीस उपस्थित राहत नाहीत, विभागीय चौकशी प्रकरणांवर कार्यवाही वेळेत पुर्ण होत नाही, पुर्तता अहवाल समितीला वेळेवर सादर केला जात नाही, इ. निरीक्षणे समितीने नोंदविली. तसेच, यासंदर्भात मुख्य सचिव यांनी कायमस्वरूपी उपाययोजना करून भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांच्या अहवालावरील प्रलंबित परिच्छेदांच्या व लोकलेखा समितीने शासनास केलेल्या शिफारशींच्या निपटाऱ्यांचे योग्य प्रकारे पर्यवेक्षण होईल, पुर्तता अहवाल वेळेत सादर होतील, तसेच सर्व बाबींसाठी कालमर्यादा निश्चीत केली जाईल व त्याचे काटेकोरपणे पालन होईल अशाप्रकारे कार्यवाही करण्याबाबत सूचित केले आहे.

**शासन परिपत्रक-**

प्रस्तावनेत नमूद बाबी विचारात घेऊन लोकलेखा समितिचे विनियोजन लेखे अहवाल परिच्छेद, नागरी अहवाल परिच्छेद, लोकलेखा समितीच्या शिफारशींवरील व इतर सर्व विधीमंडळ कामकाजाविषयी आवश्यक ते स्पष्टीकरण महालेखापाल आणि शासनास विहीत कालावधीत सादर करण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे सूचना या परिपत्रकाद्वारे देण्यात येत आहेत :-

१. लोकलेखा समितीचे विनियोजन लेखे अहवाल परिच्छेद, नागरी अहवाल परिच्छेद, महसूली अहवाल परिच्छेद व लोकलेखा समितीच्या शिफारशींवरील कार्यवाहीला सर्वोच्च प्राधान्य देण्यात यावे.
२. विधीमंडळाच्या विविध समित्यांचे प्रलंबित असलेले संदर्भ व विधानमंडळाशी संबंधीत अन्य कामकाज, तारांकित प्रश्न, अतारांकित प्रश्न, औचित्याचे मुद्दे इत्यादी विषयक बाबींचे संकलन होऊन वेळेवर माहिती अद्ययावत व्हावी याकरीता “ई-समिक्षा” पोर्टलच्या धर्तीवर संगणक आज्ञावली लवकरच माहिति व तंत्रज्ञान विभागामार्फत विकसित केली जाणार आहे. त्यात ही माहिती अपलोड करावी. त्यानुसार ह्याबाबत संनियंत्रण व्हावे.

३. विधानमंडळ विषयक कामकाजाशी संबंधित बाबींचा Key Result Area (KRA) मध्ये समावेश करण्यात आलेला आहे. त्यामुळे, ग्रामपंचायत, पंचायत समिती, जिल्हा परिषद येथील कार्यालय प्रमुख अधिकाऱ्यांच्या कामाचे कार्यमुल्यांकन प्रस्तुत विधानमंडळ कामकाजाच्या कार्यपुर्ततेच्या आधारावर करण्यात यावे.

४. विभागीय चौकशी प्रकरणांची (१) आर्थिक अनियमितता व (२) प्रशासकीय अनियमितता या दोन वर्गात विभागणी करावी. आर्थिक अनियमितता संदर्भातील प्रकरणांना प्राधान्य देण्यात यावे. ह्या संदर्भातील विभागीय चौकशी प्रकरणांवर कार्यवाही एक वर्षाच्या आत पूर्ण करावी. व विभागीय चौकशी अधिकाऱ्यांचा अहवाल प्राप्त झाल्यानंतर शिक्षेसंदर्भातील कार्यवाही ३ महिन्यात पूर्ण करून आदेश निर्गमित होऊन कार्यवाही करावी.

५. लेखा परिक्षण/वित्तीय बाबींच्या अनुषंगाने तांत्रिक अपूर्णता राहणार नाहीत या अनुषंगाने लेखा परिक्षण/वित्तीय बाबींचे विशेष ज्ञान असलेल्या अधिकाऱ्यांकडे शक्यतोवर लोकलेखा समितीविषयक कामकाज सूपूर्त करावे.

६. मा.मुख्य सचिव यांची दि.७.१०.२०१५ रोजी झालेल्या साक्षी दरम्यान ११ व्या विधानसभा कार्यकाळातील लोकलेखा समितीच्या ४४ शिफारसी व १२ व्या विधानसभा कार्यकाळातील २३४ शिफारशी अशा एकूण २७८ शिफारशींवर आगामी ३ महिन्यात कार्यवाही पूर्ण करण्यात येईल असे आश्वासन दिले आहे. त्यानुसार आगामी ३ महिन्यात कार्यवाही पूर्ण करावी.

याबाबत शासन निर्णय व परिपत्रक क्र.भानिम १०११/प्र.क्र.१९/लोलेस, दि.१० मे,२०११ अगोदरच निर्गमित करण्यात आले असून त्यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी. तसेच वरील सुचनांचे काटेकोरपणे पालन करून विहित मुदतीत सर्व बाबींचा निपटारा करावा व यासंबंधी कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२०११४०५७५९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHINDE VIJAY DATTATRAYA

Digitally signed by SHINDE VIJAY DATTATRAYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GAD,CID - 917064, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SHINDE VIJAY DATTATRAYA
Date: 2015.10.20 14:58:16 +05'30'

( वि.द.शिंदे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
२. सर्व विभागीय आयुक्त.
३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
४. सर्व सह सचिव/उप सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग,
५. सर्व उप आयुक्त (आस्थापना / विकास), विभागीय आयुक्त कार्यालय.
६. मा.प्रधान सचिव (ग्रा.वि.व पं.रा.) यांचे स्वीय सहायक, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, मुंबई.
७. सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी, ग्रामविकास व जलसंधारण विभाग.
८. कक्ष अधिकारी, कार्यासन- लोलेस, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती, समन्वय कक्ष.